**महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षा - २०१४ च्या अंतिम निकालाद्वारे शिफारसप्राप्त उमेदवारांच्या एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षणाबाबत (सीपीटीपी-२)....**
**मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-२०१५/ प्र.क्र.४६/१४/१८-ब**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ एप्रिल, २०१५.

**वाचा :**

१. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/ प्र.क्र. ८४/१३/ १२-अ, दिनांक २०.१.२०१४.
२. शासन पत्र क्रमांक टिआरएन-०३१५/प्र.क्र.३४/१५/१८-ब, दिनाक ८.४.२०१५.
३. शासन पत्र क्रमांक टिआरएन-०३१५/प्र.क्र.३५/१५/१८-ब, दिनाक ८.४.२०१५.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे गट-अ आणि गट-ब मध्ये सरळसेवेने नियुक्त होणा-या विविध १९ संवर्गातील अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत सुरु करण्याबाबतचा निर्णय शासनाने उपरोक्त अनुक्रमांक १ वर नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे.

२. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या अंतिम निकालाच्या आधारे गट-अ आणि गट-ब मधील शिफारसप्राप्त उमेदवारांना उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक २ व ३ अनुसार काही अटींच्या अधिनतेने तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे. **सन २०१५ च्या या तुकडीतील** परिवीक्षाधीन अधिका-यांचा एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी-२) खालील मार्गदर्शक सूचनांनुसार राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे :-

(अ) उपरोक्त अनुक्रमांक २ आणि ३ च्या शासन पत्रान्वये शिफारसप्राप्त उमेदवारांना त्यांच्या चारित्र्य तपासणी, वैद्यकीय तपासणी आणि जात प्रमाणपत्र पडताळणी वैधतेच्या अधिनतेने एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षणासाठी (सीपी्टीपी-२) तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे. या बाबींच्या पूर्ततेअंती प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी या उमेदवारांना परिवीक्षाधीन अधिकारी म्हणून नियमित नियुक्तीचे आदेश देण्यात येतील.

(ब) एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी उमेदवारांनी दिनांक २ मे, २०१५ पासून संबंधित प्रशिक्षण संस्थेमध्ये मूळ प्रमाणपत्रांच्या तपासणीसाठी उपस्थित राहण्याच्या सूचना उपरोक्त अनुक्रमांक २ आणि ३ वर नमूद केलेल्या शासन पत्रान्वये देण्यात आल्या आहेत. उमेदवारांना प्रमाणपत्र तपासणीसाठी दिनांक २९.४.२०१५ ते दिनांक १.५.२०१५ असा अवधी देण्यात आलेला आहे. प्रत्यक्ष प्रशिक्षण दिनांक २ मे, २०१५ पासून सुरु होणार असले तरी, प्रमाणपत्र तपासणीसाठी, सध्या शासन सेवेत असलेल्या उमेदवारांनी दिनांक २८ किंवा २९

एप्रिल, २०१५ (मध्यान्ह नंतर) रोजी कार्यमुक्त व्हावे. या अवधीत कार्यमुक्त झाल्याच्या दिनांकापासून ते दिनांक १ मे, २०१५ पर्यंतचा त्यांचा कालावधी कर्तव्यार्थ कालावधी म्हणून नियमित करण्यात येईल. मात्र सध्या शासन सेवेमध्ये नसलेले उमेदवार दि. २९.४.२०१५ ते १.५.२०१५ या कालावधीपैकी कोणत्याही दिवशी उपस्थित झाले तरी त्यांना दिनांक २.५.२०१५ पासूनच नियुक्ती देण्यात येईल, याची त्यांनी नोंद घ्यावी. उमेदवार प्रशिक्षण संस्थेमध्ये उपस्थित झाल्यापासून संबंधित संस्थेमध्ये निवासाची सोय उपलब्ध करुन देण्यात येईल.

(क) राज्यसेवा परीक्षा-२०१४ चा अंतिम निकाल महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून दिनांक ५.४.२०१५ रोजी जाहिर करण्यात आला. तद्नंतर शिफारसप्राप्त उमेदवारांना दिनांक ८.४.२०१५ च्या पत्रान्वये तात्पुरती नियुक्ती देण्यात आली आहे. त्यामुळे राज्य शासनाच्या सेवेत कार्यरत असलेल्या शिफारसप्राप्त उमेदवारांना कार्यमुक्त करण्यासाठी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही-१०९२/प्र.क्र. १०३३/प्र.क्र. ३३/९२/८, दिनांक २.१२.१९९७ अनुसार विहित केलेला १ महिन्याचा नोटीस कालावधी शिथील करण्यात यावा.

(ड) राज्यसेवा परीक्षा-२०१३ च्या आधारे शिफारस करण्यात आलेल्या व सध्या सीपीटीपी-१ अंतर्गत प्रशिक्षण घेत असलेल्या गट-अ संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांची राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे गट-अ मधील अन्य संवर्गासाठी शिफारस करण्यात आली असेल व नवीन शिफारस केलेले पद घेण्यास संबंधित परिवीक्षाधीन अधिकारी इच्छूक असेल तर त्याने सामान्य प्रशासन विभाग़ आणि प्रशिक्षण संस्थेला प्रथम तसे कळवावे. अशा उमेदवाराने नवीन संवर्गाच्या तांत्रिक प्रशिक्षणाच्या टप्प्यावर रुजू व्हावे. गट-अ संवर्गातील पायाभूत प्रशिक्षण आणि अनिवार्य संलग्नता त्याने यापूर्वी पूर्ण केलेली असल्यामुळे प्रशिक्षणाच्या या टप्प्यापासून त्याला सूट देण्यात येत आहे. अशा उमेदवारांनी दि. २९ एप्रिल ते २ मे, २०१५ या कालावधीत तसेच पायाभुत प्रशिक्षण आणि अनिवार्य संलग्नता या प्रशिक्षणाच्या टप्प्यांसाठी प्रशिक्षणास उपस्थित राहण्याची आवश्यकता नाही. त्यांनी थेट संबंधित विभागाच्या तांत्रिक प्रशिक्षणासाठी [दिनांक १६.८.२०१५ (म. नं.) रोजी] उपस्थित व्हावे.

(इ) राज्यसेवा परीक्षा-२०१३ च्या आधारे शिफारस करण्यात आलेल्या व सध्या सीपीटीपी-१ अंतर्गत प्रशिक्षण घेत असलेल्या गट-ब संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांची राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे गट-ब मधील अन्य संवर्गासाठी शिफारस करण्यात आली असेल व नवीन शिफारस केलेले पद घेण्यास संबंधित परिवीक्षाधीन अधिकारी इच्छूक असेल तर त्याने सामान्य प्रशासन विभाग़ आणि प्रशिक्षण संस्थेला प्रथम तसेच कळवावे. अशा उमेदवाराने नवीन संवर्गाच्या तांत्रिक प्रशिक्षणाच्या टप्प्यावर रुजू व्हावे. गट-ब संवर्गातील पायाभूत प्रशिक्षण आणि अनिवार्य संलग्नता त्याने यापूर्वी पूर्ण केलेली असल्यामुळे प्रशिक्षणाच्या या टप्प्यापासून त्याला सूट देण्यात येत आहे. अशा उमेदवारांनी दि. २९ एप्रिल ते २ मे, २०१५ या कालावधीत तसेच पायाभुत प्रशिक्षण आणि अनिवार्य संलग्नता या

प्रशिक्षणाच्या टप्प्यांसाठी प्रशिक्षणास उपस्थित राहण्याची आवश्यकता नाही. त्यांनी थेट संबंधित विभागाच्या तांत्रिक प्रशिक्षणासाठी [दिनांक १६.८.२०१५ (म.नं.) रोजी] उपस्थित व्हावे.

(फ) राज्यसेवा परीक्षा-२०१३ च्या आधारे शिफारस करण्यात आलेल्या व सध्या सीपीटीपी-१ अंतर्गत प्रशिक्षण घेत असलेल्या गट-ब संवर्गातील परिवीक्षाधीन अधिका-यांची राज्यसेवा परीक्षा-२०१४ च्या आधारे गट-अ मधील अन्य संवर्गासाठी शिफारस करण्यात आली असेल, व नवीन शिफारस केलेले पद घेण्यास संबंधित परिवीक्षाधीन अधिकारी इच्छूक असेल तर त्याने दिनांक २ मे, २०१५ रोजी यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेमध्ये उपस्थित रहावे. अशा उमेदवारास कोणत्याही प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी सूट देण्यात येणार नाही.

(ग) प्रशिक्षण कालावधीत गट-अ संवर्गातील उमेदवारांना रु. ३०,०००/- आणि गट-ब संवर्गातील उमेदवारांना रु २०,०००/- इतके ठोक वेतन अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती,नागपूर यांचेमार्फत अदा करण्यात येईल. परिवीक्षाधीन कालावधीतील अनिवार्य संलग्नतेचा ६ आठवड्याचा प्रशिक्षणाचा भाग पूर्ण झाल्यानंतर (एकूण १४ आठवड्यांनंतर) संबंधित विभागाकडे तांत्रिक प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी हजर झाल्यावर या उमेदवारांच्या आधीच्या १४ आठवड्यांच्या कालावधीत अदा करण्यात आलेली ठोक वेतनाची रक्कम आणि प्रत्यक्ष वेतन यामधील फरकाची रक्कम संबंधित विभागांकडून एक रकमी अदा करण्यात येईल.

(ह) उपजिल्हाधिकारी/ तहसिलदार, पोलीस उपअधीक्षक, सहायक विक्रिकर आयुक्त/ सहायक संचालक, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा आणि उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी, या गट-अ संवर्गातील अधिका-यांकरिता प्रति महिना प्रति अधिकारी रु.३०,०००/- याप्रमाणे अनुक्रमे महसूल विभाग, गृह विभाग, वित्त विभाग आणि ग्राम विकास विभाग़ यांनी तसेच कक्ष अधिकारी, सहायक निबंधक सहकारी संस्था, उप अधिक्षक भुमी अभिलेख/ नायब तहसिलदार, सहायक गट विकास अधिकारी, सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी आणि उप अधिक्षक राज्य उत्पादन शुल्क / सहायक आयुक्त राज्य उत्पादन शुल्क या गट ब संवर्गातील अधिका-यांकरिता प्रति महिना प्रति अधिकारी रु.२०,०००/- याप्रमाणे अनुक्रमे महाराष्ट्र लोकसेवा आयोग, सामान्य प्रशासन विभाग़, सहकार विभाग, महसूल विभाग, ग्राम विकास विभाग, गृह (परिवहन) विभाग़ आणि गृह (राज्य उत्पादन शुल्क) या विभागांनी एकत्रितरित्या **अग्रिम निधी** उपलब्ध करुन द्यावा. प्रशिक्षण २ मे, २०१५ पासून सुरु होणार असल्यामुळे दिनांक २ मे, २०१५ ते दिनांक १६ ऑगस्ट, २०१५ या कालावधीतील १४ आठवड्यांच्या वेतनासाठी मे, २०१५ अखेर अग्रिम निधी संबंधित विभागांनी ग़ट अ साठी यशदा, पुणे आणि गट ब साठी वनामती, नागपूर यांना उपलब्ध करुन द्यावा.

(ई) एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कालावधीतील टप्पा क्र. ३ आणि टप्पा क्र. ४ चे एकंदरीत ७४ आठवड्यांचे प्रशिक्षण संबंधित विभागांमार्फत देण्यात येणार आहे.

सीपीटीपी-१ नुसार या कालावधीतील परिवीक्षाधीन अधिका-यांचा प्रशिक्षण कार्यक्रम संबंधित विभागांनी तात्काळ तयार करुन, उमेदवारनिहाय प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत यशदा, पुणे/ वनामती, नागपूर आणि सामान्य प्रशासन विभागास, सदर प्रशिक्षण सुरु होण्यापूर्वी अवगत करण्याची व्यवस्था करावी. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी यशदा, पुणे/ वनामती, नागपूर यांचे आवश्यकता असल्यास सहकार्य घेण्यात यावे.

(ज) एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमाच्या शेवटी सर्व गट-अ व गट-ब मधील परिवीक्षाधीन अधिका-यांची अनुक्रमे यशदा, पुणे व वनामती, नागपूर यांचेकडून **प्रशिक्षण परीक्षा घेण्यात येईल**. त्याचप्रमाणे एकूण परिवीक्षाधीन कालावधीतील विविध टप्प्यासाठी गुण ठरविण्यात येतील. यासाठी गुणांचे विस्तृत वर्गीकरण यशदा, पुणे यांचेमार्फत तयार करण्यात येईल. परिवीक्षाधीन अधिका-यांचे असे एकूण गुण आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या परीक्षेतील गुण या दोन्ही गुणांची बेरीज करुन त्या गुणांनुसार उमेदवारांची त्या तुकडीतील अंतिम सेवाजेष्ठता यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर यांचेकडून निश्चित करुन ती सामान्य प्रशासन विभागाकडे पाठविण्यात येईल. अशा प्रकारे निश्चित केलेली अंतिम सेवाजेष्ठता पदोन्नती तसेच सेवा विषयक सर्व अनुषंगिक बाबींसाठी लागू राहील.

(ल) दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीत उमेदवारांचा संपूर्ण सेवाविषयक तपशील, प्रशिक्षणादरम्यानच्या मुल्यांकन अहवालासह, यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर यांच्या अभिरक्षेत असेल. तसेच परिवीक्षाधीन अधिका-यांच्या सेवाविषयक बाबींवर अंतिम निर्णय सामान्य प्रशासन विभागाकडून घेण्यात येईल.

(म) परिवीक्षाधीन अधिका-यांचा परिवीक्षाधीन कालावधी समाप्तीबाबतचे आदेश सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित करण्यात येतील व त्यानंतर या अधिका-यांना संबंधित विभागांकडे नियमित नियुक्तीसाठी सोपविले जाईल. त्याचवेळी त्यांचा सेवाविषयक अभिलेख यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर यांचेकडून संबंधित प्रशासकीय विभागाकडे पाठविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०४१७१३३११९४१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.04.17 13:58:46 +05'30'

**(डॉ. भगवान सहाय)**
अपर मुख्य सचिव (सेवा)

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई - ३२,

२) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३) प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई - ३२,
४) अपर मुख्य सचिव, गृह विभाग, जागतिक व्यापार केंद्र, मुंबई - ३२,
५) अपर मुख्य सचिव (परिवहन, व रा.ऊ. शु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
६) अपर मुख्य सचिव, कृषि व प.दु.म. विभाग, मंत्रालय, मुंबई § ३२,
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
९) प्रधान सचिव (ग्राम विकास), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) प्रधान सचिव (सहकार), सहकार, वस्त्रोद्योग व पणन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) प्रधान सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई - ३२,
१३) प्रधान सचिव (वित्त), लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई - ३२,
१४) महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
१५) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
१६) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
१८) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
१९) सहसचिव(अर्थसंकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०) उप सचिव (व्यय ४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१) निवडनस्ती कार्यासन १८-ब/ १२-अ.